३८. केवळ त्या वचनमात्राने ( म्हणजे ह्या श्लोकाच्या श्रवणाने ) राजाचा कुग्रह ( म्हणजे शृंगाराचा प्रभाव ) नाहीसा झाला. 'माझे अपकीर्तीपासून रक्षण झाले,' असे समजून तो सूरींचे उपकार मानू लागला.

३९. यांच्या उपकाराची फेड करणे मला शक्य नाही. कारण की लोकांमध्ये असे ऐकले जाते की पुष्कळ ऋण हे ऋणच नव्हे. ( म्हणजे एखाद्याचे आपल्यावर खूप उपकार झाले तर ते फेडण्यापलीकडचे असतात ).

४०. तसेच कथा, काव्य, संकथा, समस्यापूर्ती इत्यादीमध्ये दिवस जात असताना सूरी राजवाड्यात येऊन पोहोचले.

४१. ( समोरून ) येणाऱ्या सूरींना पाहून राणी राजाच्या अर्धासनावरून दूर झाली. सूरी तेथेच ( म्हणजे अर्धासनावर ) बसले.

४२. 'मंदगतीने चालत असताना पदोपदी कोण त्रासिक मुद्रा करते ?' असे म्हणून राजाने बप्पभट्टिसूरींस अर्थपूर्ण समस्यापूर्ती करण्यास सांगितले.

४३. नंतर राजाच्या पाठोपाठ ज्यांच्यावर सरस्वती प्रसन्न झाली आहे अशा मुनिवरांनी हजरजबाबीपणे म्हटले, 'खरोखर, ( राणीच्या ) कटिप्रदेशावरील नखक्षतांच्या पंक्तींना मेखला स्पर्श करते, ( म्हणून तिची मुद्रा त्रासिक झाली आहे ).'

४४. हे ऐकून राजाचे मन एकदम बेचैन झाले. 'माझ्या अंतःपुरामध्ये याचा ( म्ह. बप्पभट्टींचा ) कधी संचार झाला होता की काय!' असा विकल्प राजाच्या मनात आला.

४५. त्या रात्री राजाने राणीबरोबर काही काळ व्यतीत केला आणि नंतर भल्या पहाटे प्रथम जागा होऊन तो तेथून निघाला.

४६. अत्यंत गाढ झोपेत ( वस्त्राचे ) भान हरपलेल्या स्वपत्नीला पाहून राजाने वळून तिला वस्त्राने आच्छादिले व तेथून निघाला.

४७. अचानक ती ( म्हणजे राणी ) जागी झाली. ( व म्हणाली ), 'माझा देह राजाने सावरला! अरेरे, प्रमाद झाला! पतीला जाग येत असताना मला समजलेच नाही.'

४८. नंतर राजाने वळून पाहिले असताना तिचा मनोभाव त्याच्या लक्षात आला. राजा अर्धकवी असल्याने द्विपदीमध्ये समस्यापूर्तीसाठी ( अर्ध ) गाथा रचली.

४९. नंतर सूरी तेथे आले. ते राजाच्या अर्धासनावर बसले. राजाने म्हटले, 'या गाथेची त्वरित पूर्ती करा.'

५०. तेव्हा बप्पभट्टिसूरी म्हणाले, 'हे राजा, ऐक. ती कमलमुखी ( म्हणजे राणी ) स्वतःच्या प्रमादामुळे अजूनही उद्विग्न होते.'

५१. सूरीने असे म्हणताच राजाने कान टवकारले. इतक्यात सूरी पुढे म्हणाले, 'प्रथम जागे झालेल्याने ( म्हणजे राजाने ) जिचे अंग झाकले.'

५२. ते ऐकून राजा मनामध्ये एकदम चमकला. ( त्याला वाटले ), 'हे खरोखर माझ्या अंतःपुरातीलच जणू रहिवासी आहेत.'

५३. तिच्या वळण्याने तिचा पार्श्वभाग हा पहिल्या समस्यापूर्तीचाच विषय झाला, हे जाणून राजाच्या मनामध्ये सूरींविषयी लज्जा निर्माण झाली.

५४. राजाने विचार केला, 'हा माझा जिवलग मित्र आहे. माझ्या अंतःपुरामध्ये हा माझ्या सावलीप्रमाणे विहार करतोय.'

५५. जरी राजाच्या मनामध्ये बप्पभट्टींविषयी उपकाराची भावना वसत असली तरी या जगात वैर एकदा निर्माण झाले की ते दृढतर होते.

५६. राजाचा आदरभाव कमी झाल्याचे पाहून बप्पभट्टींनी विचार केला, 'असे अपमानित होऊन राहणे कितपत योग्य आहे ?'

५७. म्हटलेच आहे की - Th 11032

'कावळे, क्षुद्र माणसे व पशू हे आपापल्या देशातच ( असहाय्यपणे ) मरतात; शूर व विद्यावान व्यक्ती मात्र ( संकटकाळी स्वदेश त्याग करून ) कोठेही आश्रय घेतात,'

५८. 'क्षुद्र माणसाला आपला देशच प्रिय वाटतो, सांगा बरे, अत्यंत अडाणी ( म्हणजे जंगली ) मनुष्य वनावर प्रेम करतोच ना!' Th.

५९. असा विचार करून सूरी राजाला न सांगताच निघाले आणि कान्यकुब्ज नगरीस त्वरित आले.

६०. तेथे आमराजाचा शत्रू धर्मनामक राजा रहात होता. त्याने बप्पभट्टीसूरी तेथे आल्याचे जाणले.

६१. स्वतःच्या परीवारासह तो ( स्वागतासाठी ) सूरींना सामोरे गेला. जगात हे प्रसिद्ध आहे, की पूजार्हांची पूजा केली जाते.

६२. ( धर्म ) राजाने मोठ्या वैभवाने सूरींचा नगरात प्रवेश करविला आणि एका प्रासादामध्ये अज्ञातपणे ( त्यांना ) उतरविले, ( तो म्हणाला ) -

६३. 'आमराजाच्या सभेमध्ये ज्याप्रमाणे तुम्ही धर्मोपदेश देत होता, तसेच आमच्या उपस्थितीतही आपण नित्य करावे.'

६४. धर्मराजाच्या सभेमध्ये बप्पभट्टिसूरी धर्मोपदेश देत असत. ते ऐकून धर्मराजा श्रेष्ठ श्रावक बनतो.

६५. नंतर एकदा राजाने सूरींना म्हटले, 'येथे तुमचे चांगले चालले आहे. परंतु तुम्ही येथे पाहुणे आहात. म्हणून गोपालगिरीला परत जाऊन रहावे.'

६६. ज्या अर्थी आमाबरोबर तुमचा निरुपम स्नेह आहे, त्याअर्थी आज किंवा उद्या तुम्ही तेथे जाणे श्रेयस्कर.

६७. बप्पभट्टी म्हणाले, 'हे राजा, तुम्ही जसे म्हणाल तसे करेन; तथापि जर आम राजा मला नेण्यास स्वतः येईल तरच मी तेथे जाईन.'

६८. धर्मराजाने प्रत्युत्तर दिले, 'आमराजा येथे आल्यावर तुम्ही मला सांगावं,' सूरींनी ते मान्य केले.

६९. एकदा ( आम ) राजा चतुरंगसेनेसह गोपालगिरीस आला; त्याने एका मृत भिकाऱ्याला पाहिले. त्याच्या पुढे अर्धी गाथा लिहिलेली होती.

७०. ती अशी -

'तेव्हा मी निघालो असताना प्रियेने घोर आकांत मांडला.' राजा अर्धकवी असल्याने ही गाथा पूर्ण करू शकला नाही.

७१. ती अर्धी गाथा त्याने आपल्या पदरी बाळगलेल्या पाचशे पंडितांना समस्यापूर्तीसाठी सोपविली. त्यांनी आपापल्या शक्तीनुसार समस्यापूर्ती करून राजाला निरोप दिला.

७२. या पंडितांच्या काव्याचा राजाच्या मनावर प्रभाव पडत नाही. 'राजहंसाला सांडपाणी ( शब्दशः घरचे खारे पाणी ) आवडेल काय' ?

७३. ज्याने बप्पभट्टींचे सरस काव्य ऐकले आहे त्याला बहुजनांना नीरस (कर्णकटू) वाटणारे अन्य काव्य आवडणार नाही.

७४. तेव्हा त्या राजास सूरींच्या दर्शनाची उत्कंठा निर्माण झाली. जे अंतःकरणापासून काव्यमय अर्थाचे प्रतिपादन करतात ते बप्पभट्टीसूरी कोठे आहेत ? ( म्हणजे ज्यांचे काव्य उत्स्फूर्त व अर्थपूर्ण असते ते बप्पभट्टी कोठे आहेत ? )

७५. नेमके त्यावेळेस बप्पभट्टीसूरींकडून राजाला पत्र आले. त्याने ते आनंदाने वाचले. व त्या मजकुराखाली एक गाथा पाहिली.

७६. ती अशी - 'तू जरी त्यांचा त्याग केलास तरी हे तरुवरा, पर्णांचे पर्णत्व नाहीसे होत नाही; पण सावली अशी काही तुला हवी असेल तर ती त्या पानांशिवाय प्राप्त होणार काय ?'

७७. त्या गाथेच्या उत्तरार्धासाठी ( म्हणजे प्रतिगाथेसाठी ) राजाने त्या श्रेष्ठ नगरात दवंडी देवविली की, 'जो कोणी सुंदर गाथा करेल, त्याला राजा अभीष्ट वर देईल.'

७८. श्री वर्धमानसूरींचे गुरुबंधू श्री विमलसूरी तेथे होते. त्यांनी गाथा रचून राजाकडे पाठविली.

७९. संतुष्ट झालेल्या राजाने ती गाथा बप्पभट्टींच्या पत्रामध्ये समाविष्ट करून मंत्र्याबरोबर कान्यकुब्जाला पाठविली.

८०. बप्पभट्टींच्या हातात ते पत्र पडले. त्यांनी ते वाचले. ती प्रतिगाथा ( म्हणजे उत्तरार्ध ) बघून ते मनात त्वरित संतुष्ट झाले.

८१. 'हे तरुवरा ! छायेसाठी मस्तकावर धारण केलेली पाने कंपायमान होऊन जमिनीवर पडतात. त्या पर्णांच्या पर्णत्वाचा तुला काय उपयोग ?'

८२. नंतर मंत्रिवरांनी सूरींना कळविले, 'आपण गोपालगिरीस त्वरित चलावे; तुम्हांला आमराजा बोलावत आहे.'

८३. सूरींनी स्वतःची प्रतिज्ञा सचिवास सांगितली. तेव्हा मंत्री म्हणाले, 'आमदेव राजा स्वतः कसा काय बरे शत्रूच्या घरी येईल ?'

८४. बप्पभट्टिसूरी म्हणाले, 'जर आमच्याशी कर्तव्य असेल तर राजाने येथे यावे; आम्ही येथे असताना राजाला भय कोणते ?'

८५. धर्मराजाला भेटून सचिव गोपालगिरीला परत आला. आणि त्याने आमराजाला सूरींची प्रतिज्ञा सांगितली.

८६. मूल्यवान पालखीमध्ये आरूढ झालेल्या आमराजाने एका विधवेच्या ( किंवा जिचा पती परगावी गेला आहे अशा स्त्रीच्या ) घरी भिक्षेसाठी आलेल्या साधूला पाहिले.

८७. तिने म्हटले, 'महाराज, घरात चला जेणेकरून मी ( आपणांस ) भिक्षा देते.' स्वभावाने सरळ असलेले साधू ( तिच्या ) घरात गेले.

८८. नंतर यौवनाने उन्मत्त झालेल्या त्या स्त्रीने प्रार्थना केली, 'हे स्वामी, भोगाने माझे यौवन सफल करा.'

८९. तिला इष्ट असलेल्या गोष्टीची साधूंना इच्छा नसल्याने त्यांनी विचार केला, 'हा कसा बरे मला अनुकूल उपसर्ग झाला ?'

९०. चिरकाल पालन केलेल्या व्रताचा भंग करण्यापेक्षा जळत्या अग्नीत प्रवेश करणे बरे ! ज्याचे आचरण पवित्र आहे, त्याला चारित्र्यहीन होऊन जगण्यापेक्षा मृत्यू परवडला.'

९१. असा विचार करून साधू त्वरेने उंबरठ्याबाहेर जातो न जातो तोच रागाच्या भरात तिने त्याच्या पार्श्वभागावर लत्ताप्रहार केला.

९२. तिच्या पायातून पैंजण निसटून त्वरित युगशमिलान्यायाने ( म्हणजे आकस्मितपणे ) मुनींच्या पायात प्रविष्ट झाले.

९३. एका पायात पैंजण असूनही मुनी भरभर चालू लागले. पैंजणाचा त्याग न केल्याने त्यांच्या महाव्रतामध्ये हे विघ्न ( उद्भवले ).

९४. हा सर्व वृत्तांत जाणून राजाने त्वरित समस्यायुक्त पदांची रचना करून समस्यापूर्तीसाठी ती ( रचना ) पाचशे पंडितांना दिली.

९५. सर्व पंडितांनी मन लावून समस्यापूर्तीचा प्रयत्न केला; पण राजाच्या मनातील भाव कोणीही स्पष्ट करू शकला नाही.

९६. नंतर राजाने मनात बप्पभट्टिसूरींचे स्मरण केले. त्याने असा विचार केला, 'अरेरे माझ्या मनासारखी समस्यापूर्ती करणारा माझा मित्र किती दूर आहे बरे !'

९७. 'एकेकाळी मी अपरिचित आणि कफल्लक असा मित्र असताना ह्या विद्यासंपन्न बप्पभट्टिसूरींनी जो उपकार केला तो वाया गेला. ( म्हणजे मी वाया घालविला.)'

९८. 'अरेरे, निर्दयी अशा माझ्याकडून बप्पभट्टिसूरींच्या ( शब्दशः नाथांच्या ) बाबतीत निर्दयीपणा कसा बरे उद्भवला ? त्यांनी माझ्यासाठी जे काही केले ते तप्त लोहावर पडलेल्या जलबिंदूप्रमाणे वाया गेले!'

९९. 'बप्पभट्टिसूरींसारख्या सज्जनाकडून माझ्यासारख्या दुर्जनावर जो उपकार केला जातो, तो फेडणे मी जाणतो. त्याचे आजही मला स्मरण होते. मी तेथे ( बप्पभट्टिसूरींकडे ) उत्साहाने जाऊन उपकाराची फेड करेन.'

१००. 'अथवा त्या महानुभावाने माझा असा काय अपराध केला की, जेणेकरून युवतिविषयक घटनेपासून त्या प्राणप्रिय मित्राविषयी माझा आदर शिथिल झाला ?'

१०१. 'अभिमान हेच ज्यांचे धन आहे अशा बप्पभट्टिसूरींविषयी माझा आदर कमी झाल्यावर ते परदेशी गेले आणि तेथे राजगुरू म्हणून त्यांचा मोठा सत्कार झाला.'

१०२. 'म्हटलेच आहे की, शूर व्यक्ती, विद्वान लोक व रूपवती स्त्रिया जेथे जेथे जातात तेथे तेथे ( स्वपराक्रमावर ) आपले घर करतात.'

१०३. 'त्यांना किंचितही दुःख झाले नाही. मला मात्र त्यांच्या वियोगजन्य दुःखामुळे तप्त शिलेवर पडलेल्या माशाप्रमाणे चैन पडत नाही.'

१०४. 'जर मी कान्यकुब्जास गेलो तर शत्रूच्या हातून नक्कीच मरेन. येथे पर्वताचे (गोपालगिरीचे ) किंवा प्रव्रज्येचे सेवन केले तर सांप्रत ( विरहाने ) माझे प्राण जातील.'

१०५. 'म्हणून मित्राच्या भेटीने जर माझे प्राण जाणार असतील तर जावोत,' असा मनात विचार करून तो कान्यकुब्जाकडे निघाला.

१०६. ठिकठिकाणी तीन प्रकारच्या सेनेला ( म्हणजे पायदळ, घोडदळ, व हत्तीचे दळ यांना ) ( स्वतःच्या संरक्षणासाठी ) ( मागे ) ठेवून आमराजा मोजक्या लोकांसह सूर्योदयाच्या सुमारास त्वरित ( कान्यकुब्जास ) येऊन पोहोचला.

१०७. तो संध्याकाळी गुप्तपणे श्री बप्पभट्टिसूरींना भेटला. चिरकालिक मैत्री असलेल्या त्या दोघांना अत्यानंद झाला.

१०८. आमदेवाने श्री बप्पभट्टिसूरींना विनंती केली की, 'एखाद्या व्यक्तीच्या लक्षात येण्यापूर्वीच आपण गोपालगिरीस जावे. आपल्या प्रतिज्ञेची पूर्ती झालेली आहेच.'

१०९. 'माझ्या शत्रूच्या राज्यात माझ्या जीवाला धोका आहे म्हणून विलंब करू नका. श्वास घ्यायलाही मला फुरसत नाही. ( म्हणजे भीतीमुळे मला धड श्वासही घेता येत नाही).'

११०. बप्पभट्टी म्हणाले, 'मी येथे असताना तुला भीती कसली ? श्री धर्म नरेंद्राचा दरबार पाहून स्वस्थ चित्ताने जाऊ.'

१११. नंतर धर्मराजाच्या सेवकाने प्रभातकाळी सूरींना विनंती केली, 'राजा खंदकाजवळ भेटीसाठी बोलावतोय.'

११२. ( मंत्रिवेषात असलेल्या ) आम नरेंद्राचा हात धरून बप्पभट्टिसूरी निघाले. त्या पाण्याने भरलेल्या खंदकाला पाहून सूरी धर्मराजाला म्हणाले,

११३. 'कानामध्ये कर्णभूषण ( पवित्रक ) घातले असता लोक त्याला दोरा समजतात. विरहाने जो माणूस मरत आहे, त्याला कोण बरे अडवणार ? प्रेयसी उतावळी व प्रियकर बेताचेच प्रेम असलेला असा असेल तर त्यांचे मीलन कसे होणार ? तप्त व शीतल यांचा मिलाप कसा होईल ?'

( ही गाथा श्लिष्ट व चमत्कृतिपूर्ण असून **प्रभावकचरितकार** बप्पभट्टिसूरींनी हिचे एकशे आठ अर्थ केले होते असा उल्लेख करतात. पहा - **प्रभावकचरित,** श्लोक २४९ )

११४. बप्पभट्टींनी हे कवन तीन वेळा म्हटले व असा विचार केला की हा धर्म राजा आणि हा ( आम ) राजा जणू माझे प्रतिबिंब आहेत. ( दोघेही मला सारखेच जवळचे आहेत; दोघांनाही मी हवा आहे. )

११५. धर्मनरेंद्राने त्या सूरींना नमस्कार करून निरोप दिला; व म्हटले, 'लवकर. जा. व्याख्यानाची वेळ झाली आहे.'

११६. आमराजासह सूरी स्वतःच्या निवासस्थानी गेले व आमाला शिकवून ( पढवून ) ते पुन्हा राजभवनात आले.

११७,११८.सर्वांना मुक्त प्रवेश असलेल्या दरबारामध्ये राजसिंहासनावर श्री बप्पभट्टिसूरींना बसवले गेले. सामंत, मंडलेश्वर, मंत्री, महामंत्री, श्रेष्ठी यांनी वेढला गेलेला धर्मराजा त्यांच्या शेजारी बसला आणि श्री बप्पभट्टिसूरींकडून धर्मोपदेश ऐकू लागला.

११९. तेथे आमराजाचा मंत्री नजराणा घेऊन आला. त्यांच्या पाठोपाठ इतर मंत्र्यासह आमराजा तेथे आला.

१२०. तेथे सूरींना पाहून आमराजाने एक हात वर केला. त्यातून आमराजाला हे सूचित करावयाचे होते की आपण ( म्हणजे बप्पभट्टिसूरी ) खरे राजे.

१२१. नंतर बप्पभट्टिसूरींनी आपल्या मस्तकाजवळ दोन्ही हात नेऊन उंचावले. त्याचा भावार्थ असा की, 'राजाच्या मस्तकावर काय शिंगे असतात ?' ( म्हणजे आचार्यपदापुढे राजवैभवाची काय मातब्बरी ? )

१२२. त्याच्या मंत्र्याने श्री बप्पभट्टिसूरींच्या हातामध्ये पत्र दिले आणि त्यांना विनंती केली, 'तुम्हाला आमराजा बोलावतोय.'

१२३. जेव्हा बप्पभट्टिसूरी आमराजांचे गुणगान करायला लागतात तेव्हा धर्मराजा म्हणतो, 'भगवन, तो आमराजा कसा आहे ?'

१२४. 'ज्याचे.तुम्ही स्वतःच सतत नेहमी गुणग्रहण करताना दिसता, असा त्याच्यासारखा जर येथे ( या सभेत ) कोणी असेल तर तुम्ही मला दाखवा.'

१२५. सर्व सभेवर दृष्टी टाकून सूरींनी पाहिले, तेव्हा ( त्यांना असे दिसून आले की ) ज्या मंत्र्याने दोन्ही बाहू उंच केले होते तो मंत्री नसून प्रत्यक्ष आमराजाच होय.

१२६. धर्मराजा म्हणाला, 'अहो काय आमाचे निरुपम सौंदर्य ! रूपाप्रमाणेच सर्व गुण येथे संभवतात.'

१२७. नंतर आमराजा उठला. त्याने एक बोट सोडून नमस्कार केला. 'एक प्रहर लागेल असे व्याख्यान करावे,' असे आमाने सूरींना त्या कृतीने सुचविले.

१२८. त्याचा हा भावार्थ जाणून सूरींनी दोन बोटे सोडली आणि त्यातून आमाला सूचित केले, 'मी दोन प्रहर भर व्याख्यान करेन. तू स्वस्थपणे जा!'

१२९. आमराजा निघून गेला. सूरींनी असे काही व्याख्यान केले की सर्व सभेसह धर्मराजा चित्रात रेखाटल्याप्रमाणे ( निःस्तब्ध ) झाला.

१३०. श्री बप्पभट्टिसूरींचे व्याख्यान संपते न संपते तोच धर्मराजा म्हणाला, 'दिवसाचा एक प्रहर देखील लोटला नाही ( म्हणजेच काळ कसा गेला हे समजले नाही ).'

१३१. हसून सूरी म्हणाले, 'राजा, दिवसाचा पूर्वार्ध संपून देखील गेला. राजा, गेलेली घटिका जाते ती जातेच. ( म्हणजे ती परत येत नाही. )'

१३२. बप्पभट्टी म्हणतात, 'तुझ्या समवेत आम्ही गोपालगिरीस जाऊ.' तेव्हा धर्मराजा अशी विनंती करतो, 'तुमच्या प्रतिज्ञेचे स्मरण करा.'

१३३. सूरी म्हणाले, 'आमराजा येऊन गेला.' नरपती ( म्हणजे धर्मराजा ) म्हणतो, 'आमराजा येथे असताना ( आपण ) मला कसे सांगितले नाही ?'

१३४. 'खंदकाच्या किनाऱ्यावर तीनदा सूचित केले की येथे दोन राजे आहेत. येथेही दोन हात वर करून आमाची उपस्थिती सूचित केली.'

१३५. एवढ्यात द्वारपालाने धर्मराजाला खबर दिली की पानदानामध्ये सुवर्णशलाका आहे.

१३६. तेव्हा राजाने बेचैनीने कोतवालाला आदेश दिला की, 'ताबडतोब.जा व आमराजाला कैद करून आण.'

१३७. बप्पभट्टिसूरी म्हणतात, 'आम.जाऊन दोन प्रहर झाले. आधीच निघून गेलेला साप फाश्यामध्ये कसा बरे अडकेल ?'

१३८. धर्मराजाच्या सेनापतीने आमराजाचा ससैन्य त्वरित पाठलाग सुरू केला. ( परंतु ) देशसीमेपर्यंत जाऊन जसा गेला तसा हात हलवत परतला.

१३९. धर्मराजा चतुरंग सैन्य व बप्पभट्टींसह अत्यंत भक्तियुक्त होऊन आपल्या देशाच्या सीमेला पोहोचला.

१४०. धर्मराजा आपल्या सर्व मंत्र्यांना ( सूरींच्या स्वागतासाठी ) पाठवून देतो. सूरीदेखील त्याच्यासह गोपालगिरीला येतात.

१४१. आमराजा बप्पभट्टी ( येऊन पोहोचल्याचे ) जाणून ( स्वागतासाठी ) सामोरे जातो. त्यांना वंदन करून, त्यांचा हात धरून त्यांचा नगरामध्ये प्रवेश करवितो.

१४२,१४३.गाथेमध्ये, 'धुळीने माखलेला पथिक' या ( शब्दांपुढे ) 'पात्रातून गळणारे (जलबिंदू)' ही जी दोन पदे आधीच ठेवली होती; तीच नंतर आमराजाने बप्पभट्टींना दाखविली. त्या गाथार्धाला पाहून सूरींनी ( त्याची ) त्वरित पूर्ती केली. ( ती अशी - )

१४४. तेव्हा मी प्रवासाला निघालो असताना प्रियेने जे अश्रुपातपूर्वक घोर रूदन केले, त्याचे स्मरण मला जलपात्रातून स्रवणाऱ्या जलबिंदूच्या मिषाने होते.

१४५. त्या समस्यापूर्तीने राजाच्या अंतःकरणातील अहंकार पार नाहीसा झाला. सूर्य ज्याप्रमाणे अंधकाराचा प्रभाव नाहीसा करतो, त्याप्रमाणे ( राजाच्या ) अज्ञानाचा प्रभाव नाहीसा करत सूरी उपाश्रयाला येऊन पोहोचले.

१४६. दुसऱ्या दिवशी दुपारी खिडकीमध्ये सूरींसह राजा बसला असताना, सूरींना उद्देशून त्याने वृत्तबद्ध गाथेचे निवेदन केले. ती पुढीलप्रमाणे -

१४७. 'मित्रहो, माझ्या मनातील भाव ओळखून 'परिव्राजकाचा पाय नूपुरयुक्त' ह्या समस्येची पूर्ती करा.' श्री बप्पभट्टींनी तात्काळ समस्यापूर्ती केली. ती अशी -

१४८. दाराआड उभे राहून त्या सुंदर यौवनगर्वितेने वासनापूर्तीचा प्रस्ताव त्या परिव्राजकापुढे मांडला असताना त्या जितेंद्रियाने नकार दिला, म्हणून त्याचा पाय पैंजणयुक्त झाला.

१४९. ते ऐकून राजाच्या मनाची अस्थिरता पूर्णपणे नाहीशी झाली. तेथे एकत्र राहणाऱ्या अशा त्या दोघांचे दिवस सुखाने जाऊ लागले.

१५०. परदेशातून कोणा एकाने एक उत्तम समस्या आणली. ती अशी - 'वक्रग्रीव (कमानदार) दिव्याला पेय कोणाकडून दिले जात असताना तो पीत नाही ? '

१५१. 'पतीच्या स्मरणाने ओघळणाऱ्या अश्रुधारांना ढाळणाऱ्या प्रोषितपतिकेकडून वक्रग्रीव दिव्याला ( अश्रूरूपी पेय ) दिले जाते.'

१५२. हे ऐकून राजा व सर्व लोक विस्मित होऊन म्हणू लागले, 'श्री बप्पभट्टीसूरींसारखा कोणी विद्वान सांप्रत नाही.'

१५३. एकदा आमनरेंद्रासह बप्पभट्टी सभेत बसले असताना तेथे नृत्य करणाऱ्या एका श्रेष्ठ नर्तिकेकडे टक लावून पाहू लागले.

१५४. राजाने सुद्धा सूरींची दृष्टी नर्तिकेवर खिळलेली बघून विचार केला की खरोखरच माझ्या मित्राचे या नर्तकीवर प्रेम जडलेले दिसते.

१५५. 'जर माझ्या मित्राची इच्छा माझ्याकडून पुरी झाली नाही तर हे समृद्ध असलेलेल सगळेच्या सगळे सप्तांग राज्य विफल आहे असे मी मानतो.'

१५६. असा विचार करून राजाने त्या रात्री त्या नटीला पढवून राजशृंगारासह सूरींकडे पाठविले.

१५७. उपाश्रयाच्या दारातून प्रवेश करणाऱ्या त्या नर्तकीला पाहून बप्पभट्टिसूरींनी इतर सर्व श्रावकांना निरोप दिला.

१५८. 'मी तुमचीच आहे' असे म्हणून ती नर्तकी सूरींच्या जवळ येऊन बसली व ती कपटाने म्हणाली. 'मी तुमचे अंग रगडते.'

१५९. बप्पभट्टी म्हणाले, 'ठीक आहे. याने काय बिघडते!' ती संवाहन करता करता आपल्या वक्षःस्थलाने सूरींचे देहमर्दन करू लागली.

१६०. शुद्ध ( म्हणजे प्रासुक ) भूमीवर बसून सूरी अचानक रडू लागले. तिने म्हटले, 'हे. प्रभो, हर्षाच्या ठिकाणी शोक कशासाठी!'

१६१. सूरी म्हणाले, 'आम्ही गुरूंचे संवाहन करीत असू. त्यांच्या नितंबाच्या स्पर्शासारखा तुझ्या यौवनाचा स्पर्श आहे.'

१६२. 'माझ्या हाताला तसा स्पर्श झाला. म्हणून मला गुरूंचे स्मरण झाले. हे भद्रे, माझ्या रडण्याचे कारण हेच आहे; हे तू निश्चितपणे जाण.'

१६३. लज्जित होऊन गणिका आमराजाकडे गेली. ती म्हणाली, 'महाराज,.आपण मला दगडाकडे ( म्हणजे अरसिकाकडे ) का पाठविले ?'

१६४. राजा म्हणाला, 'तो दगड कसा ते सांग!' मग तिने राजाला सर्व वृत्तांत सांगितला.

१६५. मग दुसऱ्या दिवशी आमराजा सूरींजवळ गेला नाही; परंतु मध्यान्ही सूरी आपण होऊनच आमराजाच्या प्रासादात गेले.

१६६. लज्जेने मान खाली घातलेला आमराजा जेव्हा काहीच बोलेना, तेव्हा सूरी म्हणाले, 'राजा, हा काय प्रकार आहे ?'

१६७. राजा म्हणाला, 'आम्ही तुमचा अनादर केला आहे.' सूरी म्हणाले, 'तेच विचारण्यासाठी मी तुमच्याकडे आलो आहे.'

१६८. आम म्हणाला, 'काल एका नर्तकीवर तुमची दृष्टी खिळलेली पाहिली म्हणून मी तिला तुमच्याकडे पाठविले.'

१६९. 'अक्षरे वाचून आमची दृष्टी तरलित झाली आहे. ( म्हणजे थकली आहे ). तेव्हा तिच्या निळ्या वस्त्रांनी आमच्या श्रांत डोळ्यांना विश्रांती दिली.'

१७०. 'अत्यंत आसक्त होऊन किंवा रात्र संपेपर्यंत रतिक्रीडा केल्यास डोळे जसे तरळतात (थकतात ), तसे सांप्रत माझे डोळे झाले आहेत; ( म्हणूनच ) माझी नजर नटीवर खिळली होती. आमचा दुसरा काही उद्देश नव्हता,' असे सूरी म्हणाले.

१७१. 'मी आपली अवज्ञा केल्याबद्दल क्षमा असावी,' असे राजाने सूरींच्या पाया पडून म्हटले. सूरींनी राजाला क्षमा केली.

१७२. नंतर राजाच्या पुढे बप्पभट्टींनी धर्मकथेस आरंभ केला. तिच्या श्रवणाने आमराजा धर्माभिमुख झाला.

१७३. तेव्हा राजा म्हणाला, 'हे भगवान! जिनशासनातील सर्वश्रेष्ठ मुनींमध्ये आपणच प्रमुख आहात.'

१७४. सूरी म्हणाले, 'जिनशासनामध्ये सर्वोत्तम असणारे साधू दुसरेच कोणी होत. आम्ही केवळ त्यांच्या चरणरजाप्रमाणे आहोत.'

१७५. आमदेवाने विनंती केली, 'भगवन! जर येथे जवळपास कोणी तुम्हांला गुरुसमान असलेली व्यक्ती असेल, तर कृपा करून मला सांगावे.'

१७६. 'येथे वरायवाड गावामध्ये ( ? ) अत्यंत महान असे आमचे गुरू सांप्रत रहातात.'

१७७. राजाने खरोखर विचार केला की, 'श्री बप्पभट्टिसूरी अनुपम अशा चारित्र्याने ज्यांची गात्रे अलंकृत झाली आहेत असे असून परोपकारी व व्रतसंपन्न आहेत.'

१७८. 'यांनाही गुरू आहेत तर! त्यांच्या दर्शनाची माझ्यात उत्कंठा निर्माण झाली आहे. ज्यांच्या गुणांचे ग्रहण आमचे गुरू ( बप्पभट्टी ) करतात ते कसे असतील बरे !'

१७९. भिंतीच्या छायारूपी वस्त्राने ज्यांचे सर्वांग झाकले आहे अशा विमलसूरींना आमाने पौर्णिमेच्या रात्री भिंतीआडून पाहिले.

१८०. विदग्ध रसिकांपुढे विमलसूरी कथाकथन करीत होते. तो स्त्रीसौंदर्य वर्णनाचा प्रसंग होता.

१८१. महिलांच्या वैशिष्ट्यपूर्ण, शृंगारभावयुक्त, मीलन, विरह, हावभाव, शृंगारविषयक चेष्टा, विलास इत्यादींचे विवेचन सूरी करीत होते.

१८२. नंतर राजाने विस्मित होऊन विचार केला, 'आम्ही अतिशय शृंगारभावयुक्त आहोत. तथापि सूरींनी शृंगारभावाच्या ज्या छटा सांगितल्या त्या आजवर आम्हांला ठाऊकच नव्हत्या.'

१८३. 'हे सूरी अतिशय शृंगारिक असून हे सर्व ज्याअर्थी अभिनयपूर्वक सांगत आहेत त्या अर्थी हे ह्या जगातील कामुकांचे मुकुटमणी असले पाहिजेत.'

१८४. दुसऱ्या दिवशी बप्पभट्टिसूरींनी त्याच्या मनातील भाव ताडला. बप्पभट्टिसूरी विचार करतात, 'अजून हा शल्यापासून मुक्त झालेला दिसत नाही!'

१८५. 'मला असे वाटते, रात्री ह्याने विमलसूरींचे व्याख्यान ऐकले असावे. त्या दिवसापासून धर्माचरणाबाबत याची श्रद्धा कमी झाली आहे.'

१८६. 'हा त्याच ठिकाणापासून ( विमलसूरींजवळून ) परतलेला दिसतोय. अन्य ठिकाणाहून नव्हे.' बप्पभट्टिसूरींनी स्वतःच्या गुरूंच्या तोंडून याची सर्व खात्री करून घेतली.

१८७. कविवराचा वेष धारण करून ते ( म्हणजे विमलसूरी ) श्री बप्पभट्टिसूरींना भेटले. त्यांनी विमलसूरींना राजाच्या पुढे ( काव्यवाचनाची ) संधी देवविली.

१८८. लोकांचे अवधान आकर्षक रितीने वेधून घेऊन त्यांनी राजापुढे **बाहुबलिविजयाचे** कथाकथन सुरू केले.

१८९. आपल्या कथनशैलीने त्यांनी वीररस अशा प्रकारे आविष्कृत केला की, युद्धप्रिय आम तलवार उगारून जणू ( लढायला ) तयार झाला.

१९०. त्वरित त्याचा हात धरून बप्पभट्टी म्हणाले, 'राजा, ही कथा आहे, हे युद्ध नव्हे.'

१९१. जेव्हा विस्मित झालेल्या राजाने इकडे तिकडे बघण्यास सुरुवात केली, तेव्हा विमलसूरींनी त्वरित मुनिवेष धारण केला.

१९२. राजाने विचारले, 'सांगा! ही काय जादू आहे ?' तेव्हा विमलसूरी म्हणाले, 'हे, जसे आहे, तसेच जाण.'

१९३. 'आम्ही लहानपणापासूनच दीक्षा घेतली असून सर्व हिंसामय आचारांचा त्याग केला आहे. राजा, आमच्या मनात अपूर्व वैराग्य निर्माण झाले आहे.'

१९४. 'तू युद्धामध्ये अनेक राजांना पराभूत केले आहेस. ( तथापि ) केवळ आमच्या शब्दांनी तू विस्मित झालास ( आणि युद्धाला तत्पर झालास ).'

१९५. 'हे जसे, तसेच तू जाण. राजा! सर्व शृंगारवर्णन आम्ही केवळ साहित्यिक वर्णनाच्या आधारे अनुभवून जाणतो.'

१९६. 'जे.काही स्वतः पाहिले असेल, त्यावर विचार करूनच विश्वास ठेवावा. विचार न करता कार्यास आरंभ केला, तर मोठ्यात मोठ्या कार्याचाही विनाश होतो.'

१९७. 'केवळ ऐकीव माहितीचे ग्रहण करणारा होऊ नकोस. जे खरोखर पाहिलेले असते, तेच प्रत्यक्ष होय. प्रत्यक्ष पाहिल्यावरही ( योग्यायोग्यतेचा ) ग्राह्याग्राह्यतेचा विचार करावा.'

१९८. संसाराविषयी विरक्तिप्रधान असा उपदेश सूरींकडून दिला गेल्याने आमराजा प्रतिबोधित झाला. बैल ज्याप्रमाणे गाडीची धुरा धारण करण्यास समर्थ असतो, त्याप्रमाणे जिनधर्माची धुरा पेलण्यास तो समर्थ झाला.

१९९. नंतर त्याने जणू मेरू पर्वतावर उपस्थित असल्याप्रमाणे उत्तुंग व त्रिभुवनाला आश्चर्यचकित करून सोडणारे असे महावीर जिनेंद्राचे मंदिर करविले.

२००. आपल्यासाठी अर्धकोटी रक्कम खर्च करून जिनभवन निर्माण केले, जणू देहावरील अर्धकोटी रोमांच शुद्ध केले. ( म्हणजे देहावरील कोट्यवधी रोमांचांइतकी आमची पापे शुद्ध केली गेली. )

२०१. जिनबिंबाची प्रतिष्ठा करून व विविध प्रकारे जिनपूजा करून ज्याची गात्रे रोमांचित झाली आहेत, अशा आमराजाने ( जिनेंद्राच्या ) स्तवनास प्रारंभ केला.

२०२. 'आपण जिननामक जमिनीवर सुंदर पर्णांनी युक्त असलेले व शरीरात वास करणारे कर्मरूपी शत्रूंचे अरण्य शुक्लध्यानरूपी अग्नीने ( दग्ध केले आहे. )' ( दुसऱ्या चरणाचा पाद अशुद्ध असल्याने अर्थ संदिग्ध आहे. )

२०३. 'धाराधीश भोजाच्या धारानगरीत सर्वत्र खळखळ वाहणारे पाणी असते. त्या नगरीरूपी हत्तीला गोष्पदासारख्या लहान डबक्यातले जलपान आस्वाद्य होऊ शकेल काय ?'

२०४. 'मनाला आनंद देणाऱ्या अशा मानससरोवरामध्ये जो राजहंस जलक्रीडा करतो, तो राजहंस इतर क्षुद्र तळ्यात कसा आनंद मिळविणार ?'

२०५. '( सुगंधी व सरस पुष्पामुळे ) चित्ताला आनंद देणाऱ्या नंदनवनामध्ये भ्रमर स्वेच्छेने रममाण होत असताना गंधहीन व रसहीन फुलांमध्ये कसा बरे आसक्त होईल ?'

२०६. 'हे प्रभो, तुमचे निवासस्थान चंद्राप्रमाणे उज्ज्वल व अजरामर आहे. ज्याने एकदा तुम्हाला पाहिले, तो तुम्हांला सोडून रागद्वेषांनी युक्त असलेल्या अन्य देवांची कशी भक्ती करेल ?'

२०७. नंतर बप्पभट्टसूरी चतुर्विध श्रमण संघासह तसेच मांडलिक, मंत्री व सामंत यांच्याबरोबर यात्रेला निघाले.

२०८. ( पहिला चरण संदिग्ध असल्याने समाधानकारक अर्थ लागत नाही. दुसऱ्या चरणाचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे. ) -

जे काही थोडे लोक उरले होते, त्या सर्वांना सूरींच्या बरोबर पाठविण्यात आले.

२०९. नंतर श्रमणसंघ प्रत्येक गावातील, प्रत्येक नगरीतील, प्रत्येक जिनमंदिरातील जिनबिंबाची विधीप्रमाणे पूजा करीत पुढे तो मोढेरपुराला महावीर तीर्थंकराच्या मूर्तीचे वंदन करण्यासाठी आला.

२१०. पुढे तो संघ सौराष्ट्र देशातील 'वामनवल्ली'. गावी उज्जयंत पर्वतावरील नेमिनाथ तीर्थंकरांच्या मूर्तीची वंदना करण्यासाठी आला.

२११. बप्पभट्टी उज्जयंत पर्वताकडे निघाले असताना आमराजाने पुढील स्वरूपाचा हुकूम काढला.

२१२. 'जे श्वेतांबर साधू आहेत, त्यांनी क्षपणकाच्या वेषाने जावे आणि ज्या सर्व आर्यिका आहेत, त्यांनी कांबळ्याचा त्याग करून जावे.'

२१३. नंतर लोकांकडून मौखिक परंपरेने बप्पभट्टिसूरींनी असे जाणले की, आमराजाची पट्टराणी दिगंबर जैनमुनींची भक्त आहे.

२१४. पट्टराणीच्या विनंतीवरून राजाकडून बप्पभट्टींना सांगितले गेले की, 'दिगंबर जैनांना वादामध्ये जिंकून श्वेतांबरवेषाने तुम्ही नेमिनाथांना वंदन करा.'

२१५. तेव्हा बप्पभट्टिसूरींनी वादामध्ये सर्व दिगंबर जैनांना जिंकले; पुन्हा पट्टराणी म्हणते, 'हे तीर्थ दिगंबर जैनांचे आहे.'

२१६. नंतर बप्पभट्टिसूरींनी तिच्या देहावर नेत्रकटाक्ष टाकून, तापाने अंगाची लाही लाही व्हावी, तशी आग ज्याच्यामुळे होते, असा फोड निर्माण केला.

२१७. बप्पभट्टिसूरींच्या पायावर मस्तक ठेवून आमराजा विनवू लागला, 'जर कुत्र्याने अन्न उष्टे केले असेल तर पुन्हा ते खावे काय ?'

२१८. 'अथवा स्वतःच्या अपत्याने जर मातापित्याच्या मांडीवर मलविसर्जन केले तर त्यांनी काय बालकावर रागवावे ?'

२१९. नंतर बप्पभट्टींनी करुणेने क्षणातच तिला पूर्ववत केले. तेव्हा ती दुष्टा पुन्हा म्हणाली, 'हे तीर्थ आमचे आहे.'

२२०. ' देवाची वंदना जेथे केली जाते, अशा तीर्थक्षेत्रामध्ये या तीर्थाचा समावेश होतो असे जर तुमचे म्हणणे असेल तर आबालवृद्धांनी युक्त असलेल्या सर्व संघाला हा पर्वत चढू द्यावा.'

२२१. सूरी म्हणाले, 'सकाळी तुमच्याबरोबर सर्व संघ देईन.' असे म्हणून सूरी संघामध्ये आले.

२२२. रात्री सूरींनी एक गाथा रचून संघाला शिकविली. संघाने आमराजाच्या पट्टराणीपुढे त्या गाथेचा उच्चार केला.

२२३. ती गाथा अशी -

'उज्जयंत पर्वताच्या शिखरावर ज्यांची दीक्षा, ज्ञान आणि निर्वाण अशी तीन ( कल्याणके ) झाली, त्या धर्मचक्रवर्ती अरिष्टनेमींना मी वंदन करतो.'

२२४. तिने ( म्ह. पट्टराणीने ) लज्जित होऊन राजाची आज्ञा अमलात आणली. बप्पभट्टिसूरी संघासह रेवागिरी ( उज्जयंतगिरी) वर आरूढ झाले.

२२५. संघाने तेथे नेमिजिनांची पूजा केली. संघ अत्यंत संतुष्ट होऊन काही दिवस तेथेच राहिला.

२२६. तेथून शत्रुंजय पर्वतावर आणि भरूचक्षेत्राला जाऊन महिमा गायली. अशा रितीने ( बप्पभट्टिसूरी संघासह ) गोपालगिरीस आले.

२२७. संघाला एकत्रित करून सूरी म्हणाले, 'उज्जयंत पर्वताच्या शिखरावर वादविवादाच्या दरम्यान ही गाथा मी रचली होती.'

२२८. 'देववंदनापर पूजापाठामध्ये संघाने या गाथेचा समावेश करावा.' संघ म्हणाला, 'ही गाथा नित्य ( पूजा ) पाठामध्ये असू द्या.'

२२९. ( हेमचंद्रसूरींनी उदयनास म्हटले ), 'ज्याप्रमाणे बप्पभट्टींनी आमराजाला उपकृत केले, त्याप्रमाणे तुम्ही देखील कुमारपाल राजाच्या उपकारांचे स्मरण करणे योग्य आहे.'

२३०. नंतर उदयनाने गुरुभक्तिभाराने युक्त होऊन व 'ठीक आहे.' असे म्हणून तसे केले.

# विभाग पाचवा : परिशिष्टे

## परिशिष्ट १
श्री प्रभाचंद्राचार्यविरचित प्रभावकचरितातील बप्पभट्टिसूरिचरित

## परिशिष्ट २
श्री राजशेखरकृत प्रबन्धकोशातील बप्पभट्टिसूरिप्रबन्ध

## परिशिष्ट ३
बप्पभट्टिसूरिचरिताचे पं. व्ही. कृष्णम्मास्वामींनी केलेले संस्कृत गद्य रूपांतर

## परिशिष्ट ४
श्री बप्पभट्टिसूरिविरचित तारागण

## परिशिष्ट ५
श्री बप्पभट्टिसूरिविरचित चतुर्विंशतिका

## परिशिष्ट ६
श्री बप्पभट्टिसूरिविरचित शारदास्तोत्र

## परिशिष्ट ७
श्री बप्पभट्टिसूरिविरचित साधारणजिनस्तवनस्तोत्र

## परिशिष्ट ८
बप्पभट्टिसूरिकहाच्या हस्तलिखित संहितेतील मूळ पाठ व सुधारित पाठ

## परिशिष्ट ९
बप्पभट्टिसूरिकहाचा गाथानुक्रम

## ११. श्रीवप्पभट्टिसूरिचरितम् ।

§१. **बप्पभट्टिः** श्रिये श्रीमान् यद्वृत्तगगनाङ्गणे । खेलति स्म गतायाते राजा सूरः[1] कविर्बुधः ॥ १ ॥
पीत्वा यद्गोरसं तृप्ता दृप्यन्तः[2] कवितर्णकाः* । भ्रिभ्राणाः शृंगितां विज्ञगोपालैरपि[3] दुर्दमाः ॥ २ ॥
तस्यैव चरितं किञ्चित् कीर्तयिष्ये यथाश्रुतम् । मत्प्रज्ञामुकुरी(रो ?)णोति साधुशृङ्गारभूषणम् ॥ ३ ॥
अस्ति स्वस्तिनिधिः श्रीमान् देशो **गूर्जर**संज्ञया । अनुत्सेकविवेकाढ्यलोकः शोकाचलस्वरुः[4] ॥ ४ ॥
यदेकांश[5]प्रतिच्छन्दस्वःप्रमुकुरस्थितम् । गौरीशमुनिबाहुल्यात् तत्पुरं **पाटला**भिधम् ॥ ५ ॥
**जितशत्रु**र्महीनाथः पाथःपतिगभीरिमा । तत्रास्ति [6]त्रासिताशेषबाह्यान्तररिपुव्रजः ॥ ६ ॥
चित्रशास्त्ररहस्यालिकन्दकन्दलनाम्बुदः । आश्लिष्टपरमब्रह्मामन्दपीयूषसागरः ॥ ७ ॥
**मोढाख्य**प्रौढगच्छश्रीविवोढानूढमूढतः । श्री**सिद्धसेन** इत्यासीन्मुनीन्द्रस्तत्र विश्रुतः ॥ ८ ॥–युग्मम् ।
विश्वविद्यावदातश्रीर्मान्यः क्षितिभृतामपि । **मोढेरे** श्रीमहावीरं प्रणन्तुं सोऽन्यदाययौ ॥ ९ ॥
प्रणम्य विधिवत् तीर्थं पृथगाश्रयसंश्रितः । निशायां योगनिद्राभृद् ददर्श स्वप्नमीदृशम् ॥ १० ॥
उन्मीलँल्लीलया नेत्रे यत्केसरिकिशोरकः । आरूढश्चैत्यशृङ्गाग्रमुत्फालः सत्त्वशालितः ॥ ११ ॥
इति दृष्ट्वा जजागारानगारपतिरद्भुतम् । प्रीतश्च श्रावयामास प्रातर्मुनिमतल्लिकाः ॥ १२ ॥
कल्याणानामुपादानं हेतुत्वं विनयस्य तैः । ख्यापयद्भिर्नतैः पृष्ट आख्यादर्थं च तत्पुरः ॥ १३ ॥
शिष्योऽन्यवादिकुम्भीन्द्रकुम्भनिर्भेदनोद्यमः । भाग्यैः संघस्य कोऽप्यद्य समेष्यति महामतिः ॥ १४ ॥
भाविप्रभावसंसूचिस्वप्नानन्दाभिनन्दितैः । तैः समं सूरिरागच्छज्जैनालयमनालयः ॥ १५ ॥
त्रिः प्रदक्षिणयित्वा च यावन्नाथं विवन्दिषुः । तावत्षड्वार्षिको बाल एकस्तत्पुर आगमत् ॥ १६ ॥
कस्कः कौतस्कुतस्त्वं भो ! असौ पृष्टस्तदा[7]ऽवदत् । [8]**पञ्चालदेश्य-बप्पाख्य**पुत्रोऽहं **भट्टि**देहभूः ॥१७॥
**सूरपालाख्य**या शत्रून् निघ्नन् पित्रा निवारितः । अजानतेति वात्सल्यादहेतुर्विक्रमे वयः ॥ १८ ॥
एकोऽम्बामप्यनापृच्छ्यानुशयातिशयात्ततः । आगमं प्रभुपादान्ते प्रान्ते स्वस्नेहतः स्थितः ॥ १९ ॥
अस्यामानुष्यकं तेजो ध्यात्वेति गुरुभिस्ततः । किं त्वं नोऽन्तेऽवतिष्ठासुरित्यजल्प्यत हर्षतः ॥ २० ॥
मद्भाग्यैः फलितं पूज्या इत्युक्त्वा सोऽप्यवस्थितः[9] । अलिः किं नाम नो तिष्ठेद् विकाशिनि सरोरुहे ॥२१॥
एकशः श्रुतमात्रेणावधारयति निश्चलम् । अनुष्टुभां सहस्रं तु प्रज्ञायां तस्य का कथा ॥ २२ ॥
जडदुस्तर्कसंक्लिष्टा देवी वागधिदैवतम् । दुर्बोधशास्त्रहृद्वेदि मुहूर्त्तं यस्य वाञ्छति ॥ २३ ॥
प्रेक्षाभियोगसन्तुष्टाः प्रभवस्तस्य पैतृके । गत्वा **डुंबाउधी**ग्रामे[10] पितरौ प्रार्थयन्त ते ॥ २४ ॥
स प्राह यातयामो[11]ऽहमेतदेवैकपुत्रका[12] । आशाधारोऽयमावाभ्यां कथं मोक्तुं हि शक्यते ॥ २५ ॥
निर्बन्धो यदि पूज्यानां तदा नामभिधां[13] यदि । विश्रुतां **बप्पभट्टी**ति कुरुध्वे तत्सुतोऽस्तु वः ॥ २६ ॥
ओमित्युक्ते जगत्पूज्यैः श्रद्धालुनिवहस्तयोः । आजन्मकसि(शि)पु[14] प्रादान्महदास्था न निष्फला[15] ॥२७॥
**शताष्टके च वर्षाणां गते विक्रमकालतः । सप्ताधिके राधशुक्लतृतीयादिवसे गुरौ ॥ २८ ॥**
**मोढेरे** ते विहृत्यामुं दीक्षित्वा नाम चादधुः । स्वाख्या त्रिकैकादशकाद् **भद्रकीर्ति**रिति श्रुतम् ॥ २९ ॥

---

1 A B °शूरः । 2 N B अप्यन्तः । * 'वाछडा' इति B टिप्पणी । 3 A गोपालैरिव । 4 A शोकाचलस्वरुः; N °चलस्तरुः ।
5 A यदेकांशे । 6 N नाशिता° । 7 A तथावदत् । 8 B C पाञ्चाल° । 9 A C °प्यत्रास्थित । 10 N डुंबातिग्रीग्रामे ।
11 N याचयामो । 12 A °पुत्रिका; N पुत्रकः । 13 A नवविधां । 14 A C °कशिपुः । 15 A निर्मला ।

तत्पित्रोः प्रतिपन्नेन पूर्वाख्या तु प्रसिद्धिभूः । शिष्यमौलिमणेरस्य कलासद्मनवेश्मनः ॥ ३० ॥
संघश्च तद्गुणग्रामरामणीयकरञ्जितः । विदधेऽभ्यर्थनां तेषामत्रावस्थानहेतवे ॥ ३१ ॥
योग्यतातिशयं चास्य ज्ञात्वा सद्गुरवस्ततः । सारस्वतं महामन्त्रं तत्रस्थास्तस्य ते ददुः ॥ ३२ ॥
परावर्त्तयतस्तस्य निशीथे तं सरस्वती । स्वर्गङ्गास्रोतसि स्नान्त्यनावृतासीद् रहोभुवि ॥ ३३ ॥
तन्मन्त्रजापमाहात्म्यात् तादृग्रूपा[1] समाययौ । ईषद्दृष्ट्वा च तां वक्त्रं परावर्त्तयति स्म सः ॥ ३४ ॥
स्वं रूपं विस्मरन्ती च प्राह वत्स ! कथं मुखम् । विवर्त्तसे भवन्मंत्रजापात् तुष्टाहमागता ॥ ३५ ॥
वरं वृणिष्वेति तत्प्रोक्तो बप्पभट्टिरुवाच च । मातर् ! विसदृशं रूपं कथं वीक्षे[2] तवेदृशम् ॥ ३६ ॥
स्वां तनुं पश्य निर्वस्त्रामित्युक्ते स्वं ददर्श सा । अहो निबिडमेतस्य ब्रह्मव्रतमिति स्फुटम् ॥ ३७ ॥
उचैश्च मन्त्रमाहात्म्यं येनाहं गतचेतना । ध्यायन्ती दृढतोषेण त्वत्पुरः समुपस्थिता ॥ ३८ ॥
वरेऽपि निस्पृहे त्वत्र दृढं चित्रातिरेकतः । गत्यागत्योर्मम स्वेच्छा त्वदीया निर्वृतो भव ॥ ३९ ॥

§ २. अन्यदा तत्र संस्थानां (°नो ?) भद्रकीर्त्तिर्बहिर्गतः । वृष्टौ देवकुलं श्रित्वा तस्थौ स स्थैर्यसुस्थितः ॥ ४० ॥
तत्रस्थस्य पुमानेको नाकिपाकविडंबकः । समगंस्त प्रशस्तश्रीर्वृष्टिव्याकुलितस्तदा ॥ ४१ ॥
श्यामाश्मोत्कीर्णवर्णौघा सहारहृदिवांगना । स्वस्तिप्रशस्तिरत्रास्ति विहस्तितजडस्थितिः ॥ ४२ ॥
काव्यानि वाचयामास महार्थानि सुधीरसौ । सख्याद् व्याख्यापयामास [3]प्रत्यग्राद् बप्पभट्टितः ॥ ४३ ॥
तदाख्यारंजितस्वान्तः शान्ते वर्षेऽतिहर्षतः । ययौ सहैव वसतौ वसतौ तत्र च स्थितः ॥ ४४ ॥
ततो गुरुभिराशीर्भिरानन्द्य समपृच्छ्यत । आमुष्यायणतां स्वस्याचख्यौ व्रीडावशानतः[4] ॥ ४५ ॥
वयं मौर्यमहागोत्रसंभूतस्य महाद्युतेः । श्रीचन्द्रगुप्तभूपालवंशमुक्तामणिश्रियः ॥ ४६ ॥
कान्यकुब्जयशोवर्म्मभूपतेः सुयशोऽङ्गभूः । पित्रा शिक्षावशात् किंचिदुक्तः कोपादिहागमम् ॥ ४७ ॥
अलेखीद् आमइन स्वं क्षितौ खटिकया ततः । स्वनामाग्रहणेनास्य विवेकात् ते चमत्कृताः ॥ ४८ ॥
व्यमृशन् सूरयस्तत्र नखच्छोटन[5]पूर्वकम् । पूर्वं श्रीरामसैन्येऽसौ दृष्टः षाण्मासिकः किल ॥ ४९ ॥
पीलुवृक्षमहाजाल्यां वस्त्रान्दोलकसंस्थितः । अचलच्छाययाऽस्माभिर्विज्ञातः पुण्यपूरुषः ॥ ५० ॥
ततस्तज्जननी वन्यफलवर्गं विचिन्वती । अस्माभिर्गदिता वत्से ! का त्वं किं वा भवत्कुलम् ॥ ५१ ॥
कथमीदृगवस्था च सर्वमाख्याहि नः पुरः । विश्वस्ता[6] यद्वयं त्यक्तसंगा[7] मुक्तपरिग्रहाः ॥ ५२ ॥
साऽवादीत् तातपादानां किमकथ्यं ततः प्रभो ! । श्रीकन्यकुब्जभूपालयशोवर्मकुटुम्बिनी ॥ ५३ ॥
अहं सुतेऽत्र गर्भस्थे सपत्न्या मत्सरोदयात् । पुरा लब्धवरं प्रार्थ्य नृपान्निर्वासितास्म्यहम् ॥ ५४ ॥
ततोऽनुशयतो हित्वा पितृ-श्वशुरमन्दिरे । स्थाने व आगमं वन्यवृत्त्या वर्त्ते प्रभोऽधुना ॥ ५५ ॥
श्रुत्वेति सान्त्विताऽस्माभिश्चैत्यशुश्रूषया स्थिरा । तिष्ठ बालं प्रवर्द्धस्व जनकस्येव वेश्मनि ॥ ५६ ॥
तत्सपत्नी च केनापि कालेन व्यनशत् स्वयम् । सा च राज्ञा चरैः शोधयित्वा पश्चादनीयत[8] ॥ ५७ ॥
प्राच्यासंख्यगुणेनाथ मानेन बहुमानिता । वयं चात्र ततो देशाद् भूमावस्यां विजह्मिम ॥ ५८ ॥
इति श्रुतश्च वृत्तान्तस्तद्देश्यपुरुषव्रजात् । अनेन सांप्रतं भाव्यं तत्पुत्रेणैव धीमता ॥ ५९ ॥
यदाकृतिः शरीरस्य लक्षणानीदृशानि च । नर्त्ते नृपसुतं पुण्या इति ध्यात्वाभ्यधुस्ततः ॥ ६० ॥
तत्रास्स्व वत्स ! निश्चिन्तो निजेन सुहृदा समम् । शीघ्रं गृहाण शास्त्राणि संगृहाणामलाः कलाः ॥ ६१ ॥

---

1 N °तद्रूपा सा । 2 A B C वीक्ष्ये । 3 N प्रत्यगाद् । 4 N वशाननः । 5 C °छोदन° । 6 A विश्वस्था । 7 A संगाव । 8 N °दनायिता ।

ताश्चेमाः—

पठितं लिखितं सम्यग्गणितं गीत-नर्त्तने । वाद्यं व्याकरणं छन्दो ज्योतिषं शिक्षया सह ॥ ६२ ॥
निरुक्तं च तथा कात्यायनं च सनिघंटुकम् । पत्रच्छेद्यं नखच्छेद्यं सह रत्नपरीक्षया ॥ ६३ ॥
आयुधाभ्याससंयोगश्च गजारोहणमेव च । तुरगारोहणं शिक्षा तयोः प्रत्येकमद्भुता ॥ ६४ ॥
5 मन्त्रवादो रसवादः खन्यवादस्तथैव च । रसायनं च विज्ञानवादो मतिविबोधकः ॥ ६५ ॥
तर्कवादश्च सिद्धान्तो विषनिग्रह-गारुडे । शाकुने वैद्यकं चैवाचार्यविद्या तथागमः ॥ ६६ ॥
प्रासादलक्षणं चैवं सामुद्रिकमथ स्मृतिः । पुराणं इतिहासश्च तथा वेदविधिर्वरः ॥ ६७ ॥
विद्यानुवाद-दर्शनसंस्कारौ खेचरी कला । अमरीकरणं चेन्द्रजालं पातालसिद्धिभृत् ॥ ६८ ॥
धूर्तानां शंबलं गन्धयुक्तिः वृक्षचिकित्सया । कृत्रिममणिकर्माणि सर्ववस्तुकृतिस्तथा ॥ ६९ ॥
10 वंशकर्म पुष्पकर्म चित्रकर्म कलाद्भुतम् । काष्ठ-पाषाणयोः कर्म लेपकर्म तथापि च ॥ ७० ॥
चर्मकर्म यन्त्रकर्म तथा रसवतीविधिः । काव्यालंकार-हसिते संस्कृत-प्राकृते तथा ॥ ७१ ॥
पैशाचिकं अपभ्रंशः कपटं देशभाषया । धातुकर्म प्रयोगाणामुपायाः केवलीविधिः ॥ ७२ ॥
एवंविधकलानां च द्वासप्ततिमधीतवान् । अनन्यसदृशः कोविदानां पर्षदि सोऽभवत् ॥ ७३ ॥
तथा चाभ्यस्यतस्तस्य प्रज्ञादर्पणबिम्बितः । ययौ लक्षणतर्कादिशास्त्रव्रातः स्ववश्यताम् ॥ ७४ ॥
15 सब्रह्मचारितासख्याद् राजपुत्रः प्रपन्नवान् । बप्पभट्टे ! प्रदास्यामि प्राप्तं राज्यं तव ध्रुवम् ॥ ७५ ॥
कालेन केनचित् तस्यातंकिना जनकेन च । प्रधानाः प्रेषिताः पट्टाभिषेककृतिहेतवः (ल्वे ?) ॥ ७६ ॥
कृच्छ्रादाप्रच्छ्य तं प्राप्तपुरं राज्येऽभ्यषिच्यत[1] । पित्रा स स्वर्गतेरस्य कृतवानौर्ध्वदेहिकम् ॥ ७७ ॥
लक्षद्वितयमश्वानां चतुर्दशशतानि च । रथानां हस्तिनां पत्तिकोटी राज्यमसाधयत् ॥ ७८ ॥
§ ३. स्वकीयसुहृदः प्रेषीदाह्वानाय नरानथ । आमनामा नृपः श्रीमानतिमानपवि*मः ॥ ७९ ॥
20 तेषां चात्यादरान् संघानुमत्या गुरवस्ततः । प्राहिण्वन् बप्पभट्टिं तं गीतार्थैः परिवारितम् ॥ ८० ॥
तीर्थप्रभावनोन्नत्यै शनैः संयमयात्रया । जगामाध्यामधामश्रि पुरमाममहीशितुः ॥ ८१ ॥
तदागमलसद्वर्णाकर्णनादर्णवो यथा । द्विजराजसमुद्योतादुद्वेलः स तदाऽभवत् ॥ ८२ ॥
भूपः समग्रसामग्र्या संमुखीनस्ततोऽगमत् । कुञ्जरारोहणे 'विद्वत्कुञ्जरस्यार्थनां व्यधात् ॥ ८३ ॥
बप्पभट्टिरुवाचाथ भूपं क्षमवतां पतिः । सर्वसङ्गमुचां नोऽत्र प्रतिज्ञा हीयतेतमाम् ॥ ८४ ॥
25 राजोचे वः पुरा पूर्वं यन्मया प्रतिशुश्रुवे । राज्यमात्रं प्रदास्यामि तल्लक्ष्म वरवारणः ॥ ८५ ॥
काममेवागुमाप्त[3] चेद् यूयं तन्मम प्रभो ! । 'उपदेशापार्तिदानेनामुख्यं कर्तुं न साम्प्रतम् ॥ ८६ ॥
इत्यारोप्य बलात् पट्टकुञ्जरे धरणीधरः । जितक्रोधाद्यभिज्ञानधृतच्छत्रचतुष्टयम् ॥ ८७ ॥
विश्वस्य दर्शयन्तं सदामरैर्वीजितं[5] प्रभुम् । प्रावेशयत् शमिश्रेणीश्वरमत्युत्सवात् पुरम् ॥ ८८ ॥—युग्मम् ।
राज्यचिह्नमिदं धुर्यमिति सिंहासनासनम्[6] । सौधान्तरमनुत्याह भूपं मुनिरथावदत् ॥ ८९ ॥
30 जातं सूरिपदेऽस्माकं कल्प्यं सिंहासनासनम् । इति तस्य वचः श्रुत्वा खिन्नोऽन्यासन्यवीविशत् ॥ ९० ॥
दिनानि कतिचित्तत्रावस्थाप्य गुरुसन्निधौ । प्राजीहयत् प्रधानौघैः[7] समं मुनिपतिं नृपः ॥ ९१ ॥
मोढेरकस्थितं[8] श्रीमत्सिद्धसेनमुनीश्वरम् । प्रणम्य प्रह्ववाणीभिरथ व्यज्ञपयन्नमी ॥ ९२ ॥

1 N °ऽभिषिच्यताम्; A ऽभिषिच्यत । 2 N विद्वान् । 3 A काममेवाममा° । 4 N उपदेशार्ति° । 5 B N वीजितुं । 6 A °सनासनी । 7 N प्रधानाद्यैः । 8 N °स्थिति ।

चकोरवदचन्द्रेऽभ्रे मराल इव पल्वले। वने मृगवदेकाकी स्तोकाम्भसि च मीनवत्॥ ९३॥
मयूर इव घर्मर्तौ[1] वर्षासु जलधिर्यथा। संग्रामे कातरो यद्वद् विद्वान् वैधेयमण्डले॥ ९४॥
चन्द्रवत् कृष्णपक्षान्तः[2] क्षीयते विरहातुरः। स्वामी नः प्रत्यहं पूज्या! अनेन मुद्गदा विना॥ ९५॥
—त्रिभिर्विशेषकम्।

आचार्यत्वे प्रतिष्ठाप्य [3]निष्ठाधिष्ठातृदैवतम्। अमुं प्रेषयतास्माभिः सह नः स्वामिनो मुदे॥ ९६॥ 5
अस्योपदेशतो जैनमन्दिर-प्रतिमादिभिः। निर्मितैः सुकृते राजा भवाब्धिं लंघयेद् यथा॥ ९७॥
श्रुत्वेति तत्पुरोऽवोचद् वाचंयमपतिस्तदा। चारित्राचारधौरेयः सुधामधुरया गिरा॥ ९८॥
रत्नदीपो यथागारे बाह्यान्तरतमोपहः। तेजस्वी निश्चलस्थेमा तथा वार्लर्पिरेप नः॥ ९९॥
भानुनाम्भोरुहं यद्वत् शशिनेव विभावरी। शिखण्डीव पयोदेन मन्त्री मुद्रां विना यथा॥ १००॥
स्तम्भेनेवोज्झितं गेहं देहं च प्राणधारिणाम्। म्लायत्येव मनोवृत्तिस्तथास्माकममुं विना॥ १०१॥—युग्मम्। 10
इत्याकर्ण्य प्रभोर्वाचं प्राहुः कृतधियोऽथ ते। सन्तः परोपकारार्थे नात्मार्तिं गणयन्ति यत्॥ १०२॥
तरवस्तरणेस्तापं स चाभ्रोल्लंघनक्रमम्। पाथोधिर्नौश्रमं सोढा वोढा कूर्मः क्षितेर्धुरम्॥ १०३॥
वारिदो वर्षणक्लेशं क्षितिर्विश्वासुमत्क्रमम्[4]। उपकाराद् ऋतेऽमीषां न फलं किंचिदीक्ष्यते॥ १०४॥—युग्मम्।
ततः प्रसादप्रावीण्यात् प्रेषयध्वं कृतीश्वरम्[5]। एवं कृत्वा प्रभुत्वेऽस्मत्स्वामिवाग्गिरेः पविम्[6]॥ १०५॥
तेषां निर्बन्धसम्बन्धादित्यभ्युपगते गुरुः। श्रीमन्तं संघमाहूय तत्प्रतिष्ठार्थमादिशत्॥ १०६॥ 15
अथोत्सवेच्छुभिः स्वच्छैः[7] श्रावकैर्गच्छवत्सलैः। सद्यः समग्रसामग्र्यां विहितायां जिनालये॥ १०७॥
लग्नेऽथ सौम्यषड्वर्गाधिष्ठितो परमाक्षरम्। सप्तग्रहबलोपेते श्रुतोक्तविधिपूर्वकम्॥ १०८॥
शिष्यस्य विश्वशिष्यस्य कर्णे चन्दनचर्चिते। गर्जत्सु तूर्यसंघातेष्वर्हत्तत्त्वं न्यवीविशत्॥ १०९॥
—त्रिभिर्विशेषकम्।

बप्पभट्टिस्ततः श्रीमानाचार्यः कोविदार्यमा। दुर्वादिसिंहशरभोऽभवद् विश्वस्य विश्रुतः॥ ११०॥ 20
अथानुशिष्टो विधिवद् गुरुभिर्ब्रह्मरक्षणे। तारुण्यं राजपूजा च वत्सानर्थद्वयं ह्यदः॥ १११॥
आत्मरक्षा तथा कार्या यथा न च्छल्यते भवान्। वामकामपिशाचेन यत्नं तत्र पुनःपुनः॥ ११२॥
भक्तं भक्तस्य लोकस्य विकृतीश्चाखिला अपि। आजन्म नैव भोक्ष्येऽहममुं नियममग्रहीत्॥ ११३॥
तुङ्गतूर्यध्वनिः श्राद्धाङ्गना[8]सङ्गीतमङ्गलः। गौरवाभ्यर्थितः संघेनाथ प्रायादुपाश्रये॥ ११४॥
एकादशाधिके तत्र जाते वर्षशताष्टके (८११)। विक्रमात् सोऽभवत्सूरिः कृष्णचैत्राष्टमीदिने॥११५॥ 25

§४. श्रीमद्राममहाभूपश्रेष्ठामात्योपरोधतः। अनिच्छतोऽपि संघस्य प्रैषीत् तैः सह तं गुरुः॥ ११६॥
प्रयाणैः प्रवणैः प्राप कन्यकुब्जपुरं ततः। प्रासुके वहिरुद्देशेऽवतस्थे स वनाश्रिते॥ ११७॥
उद्यानपालविज्ञप्तेः[9] परिज्ञाय समागतम्। मुनीशमवनीशोऽभूद् बद्धरोमाञ्चकञ्चुकः॥ ११८॥
ततः प्रत्यापणं हट्टशोभाशोभितरथ्यकम्। प्रतिगेहं प्रतिद्वारं बद्धवन्दनमालिकम्॥ ११९॥
उद्यद्धूपघटीधूमस्तोमैः कृष्णाभ्रविभ्रमम्। कुर्वाणमाहितोल्लोचैरेकच्छायं महीतलम्॥ १२०॥ 30
कश्मीरजद्रवैः सिक्तधरं काश्मीरभूमिवत्। नगरं नगभिद्रङ्गतुल्यं भूपतिरातनोत्॥ १२१॥
—त्रिभिर्विशेषकम्।

प्ररूढप्रौढसौहार्दवसुधाधीशसंस्तुतः। पुरं पौरपुरन्ध्रीभिराकुलाट्टालकं ततः॥ १२२॥

1 N घर्मार्तो। 2 N °पक्षान्ते। 3 N °धिष्ठान°। 4 °विश्वभरक्रमं। 5 B कृतीश्वरः। 6 A पविं; N पतिं। 7 N स्वस्थैः।
8 N श्रद्धांगना। 9 N B विज्ञप्ते।

प्रविवेश विशामीश इव सच्छत्रचामरः । अभ्रंलिहद्विपारूढो विबोढोपशमश्रियः ॥ १२३ ॥–युग्मम् ।
सौधे राजा ततः सिंहासने गन्द्रिका( कया ? )स्तृते[1] । उपावेशयदानन्दात् सुहृदं मुनिनायकम् ॥ १२४ ॥
प्रांशुप्रभावनोद्भूतरङ्गः संघः प्रभोरथ । परिचर्यां परां चक्रे वक्रेतरमनाः सदा ॥ १२५ ॥
शश्वद्राजसभायामपि निर्धूतकल्मषः । बप्पभट्टिः[2]प्रभुः श्रीमान् भूपाग्रे सुकृतं जगौ ॥ १२६ ॥
5 कल्याणपादपारामजलवाहजलप्लवः । धर्म एव निराधाराधारः[3] परपदप्रदः ॥ १२७ ॥
तस्यादौ प्रथितं दानं तच्च क्षेत्रेषु सप्तसु । तेषु च प्रथमं विद्धि सिद्धिकृज्जिनमन्दिरम् ॥ १२८ ॥
अपरं बिम्बनिर्माणमथ सिद्धान्तलेखनम् । चातुर्वर्ण्यस्य संघस्याभ्यर्चैतानि किल क्रमात् ॥ १२९ ॥
तदन्तरा च सर्वेषामाधारो जैनमन्दिरम् । जिनाः श्रुतधराश्चात्र[4] स्थिताः संघप्रबोधकाः ॥ १३० ॥
श्रीमतां सति सामर्थ्ये विधेयं विधिवच्च तत् । बहवो यत्प्रभावेन भव्याः सद्गतिमाप्नुयुः ॥ १३१ ॥
10 इति तद्वाक्यमाकर्ण्य प्रकर्णानां शिरोमणिः । अवोचदामभूपालः प्रालेयांशुस्फुरद्यशाः ॥ १३२ ॥
पृथ्वी देशः पुरं हर्म्यं तिथिर्मास ऋतुः समाः । धन्यान्येतानि भास्वन्ते यानि त्वद्देशनांशुभिः ॥ १३३ ॥
इत्युक्त्वाऽदात् तदादेशं भूमिलक्षणवेदिनाम्[5] । कोशकर्मनराध्यक्षपुंसां च श्रीजिनौकसे ॥१३४॥–युग्मम् ।
विश्वकर्मविदस्तत्र विश्वकर्मसु कर्मठाः । प्रारेभिरे महाभूत्या प्रासादं सुकृतोत्सवैः ॥ १३५ ॥
दिनैः कतिपयैः सैकशतहस्तोन्नतस्थितिः । प्रासादः परिनिष्पेदे सर्वलोकमुदा समम् ॥ १३६ ॥
15 पूर्णवर्णसुवर्णाष्टादशभारप्रमाणभूः । श्रीमतो वर्द्धमानस्य प्रभोरप्रतिमानभूः ॥ १३७ ॥
निरमाप्यत संप्राप्यागण्यपुण्यभरैर्जनैः । धार्मिकाणां संचरन्ती प्रतिमा प्रतिमानसम् ॥ १३८ ॥–युग्मम् ।
श्रीबप्पभट्टिरेतस्या निर्ममे निर्ममेश्वरः । प्रतिष्ठां स[6] प्रतिष्ठासुः परमं पदमात्मनः ॥ १३९ ॥
तथा गोपगिरौ लेप्यमयबिम्बयुतं नृपः । श्रीवीरमन्दिरं तत्र त्रयोविंशतिहस्तकम् ॥ १४० ॥
सपादलक्षसौवर्णटङ्कनिष्पन्नमण्डपम् । व्यधापयन्निजं राज्यमिव सन्मत्तवारणम् ॥ १४१ ॥–युग्मम् ।
20 एवमभ्यर्हितो राज्ञा गच्छन् सच्छत्रचामरः । राजकुञ्जरमारूढो मुख्यसिंहासनासनः ॥ १४२ ॥
मिथ्यात्वध्यामलाभोगान् लोकान् मत्सरपूरितान् । बप्पभट्टिप्रभुश्चक्रे वक्रेतरनरस्तुतः ॥१४३॥–युग्मम् ।
राजा पूज्यद्विजातीनां[7] संसर्गादनुवर्त्तकः । अन्यदान्यन्महीपालासनमाधत्त सूरये ॥ १४४ ॥
ततस्तदाशयं ज्ञात्वा विगताकारवैकृतः । जगाद प्रतिबोधाय तस्यागाधैकसत्त्वभृत् ॥ १४५ ॥
कृतप्राकृतसत्त्वानां मदादीनां जनद्विपाम् । दम्भस्तम्भादियुक्तानां कथं लक्ष्या भवादृशाः ॥ १४६ ॥
25 ततः यदुक्तं–

मर्दय मानमतंगजदर्पं विनयशरीरविनाशनसर्पम् ।
क्षीणो दर्पाद् दशवदनोऽपि यस्य न तुल्यो भुवने कोऽपि ॥ १४७ ॥

इत्याकर्ण्य गिरं धीरां बुद्ध्वा सूरिं व्यजिज्ञपत् । प्रभो! त्वद्वाक्यमश्रेमेंऽत्रलेपगरलं हृतम्[8] ॥ १४८ ॥
प्रभवः प्रभवः क्षेत्रे मम धान्यं हि सौहृदम् । स्वादतामत्र संपन्नभक्तपाकादिसंस्कृतम् ॥ १४९ ॥
30 § ५. अन्तःपुरेऽन्यदा म्लानवक्त्राभां वल्लभां तदा । राजा दृष्ट्वाह गाथार्धं स्वेच्छयेति प्रभोः पुरः ॥ १५० ॥

तद्यथा–

'अज्जवि सा परितप्पइ कमलमुही अत्तणो पमाएण ।'
सारसारस्वतोद्गारसिद्धयाथ गुरुर्गिरा ॥ १५१ ॥

---

1 N गद्दिकयास्तृते । 2 N बप्पभट्टिप्रभुः, C °भट्टिः प्रभुश्रीमान् । 3 B N °धाराधारं । 4 N °धरा यत्र । 5 A °वेदिना । 6 C N सुप्रति° । 7 N राजा प्रद्विजजातीनां । 8 N हृतम् ।

गाथोत्तरार्धमाचख्यौ सख्यौ स्नेहं वहन् नृतम्।
'सुत्तविउद्धेण[1] तए जौसे पच्छाइयं अंगं' ॥ १५२ ॥

इन्द्रेदिवचसा तुष्टः प्रशंसन् कविकर्म तत्। तस्थौ किञ्चिदिव भ्रान्तः पुनरभ्रान्तलोचनः ॥ १५३ ॥
नृपो निरुपमप्रेमनिधिः शमभृता सह। अन्यदा ददृशे देवीं संचरन्तीं[2] पदे पदे ॥ १५४ ॥
व्यथ्यमानामिव कापि मुखभङ्गविकारिणीम्। कृपापरिष्कृतस्वान्त[3] इव गाथार्धमब्रवीत् ॥ १५५ ॥ 5

तद् यथा–
'बाला चंकंमंती पए पए कीस[4] कुणइ मुहभंगं।'
ततः सत्यवचोवीचिबन्धुरं प्रावदत् प्रभुः ॥ १५६ ॥
असूनृतं न जल्पेत कल्पान्तेऽपि हि सिद्धवाक्।
'नूनं रमणपएसे मेहलया छिवइ नहपंती[5]' ॥ १५७ ॥ 10

श्रुत्वेति भूपतिः किंचित् सभ्रान्तो विकृतं मुखम्। चक्रे हिमोर्मिसंक्लिष्टसरोरुहमिवाद्युति ॥ १५८ ॥
इत्यालोक्य समुत्थाय प्रतिश्रयगतो मुनीन्। विहारहेतुं संवाह्य स्नेहमोहापराजितः ॥ १५९ ॥
काव्यमेतद् विलिख्याथ बहिर्द्वारकपाटयोः। श्रीसंघमप्यनापृच्छ्य निरगान्नगराद् बहिः ॥१६०॥–युग्मम्।

तद्यथा–
यामः स्वस्ति तवास्तु रोहणगिरेर्मत्तः स्थितिप्रच्युता 15
वर्तिष्यन्त इमे कथं कथमिति स्वप्नेऽपि मैवं कृथाः।
श्रीमंस्ते मणयो वयं यदि भवल्लब्धप्रतिष्ठास्तदा
ते शृङ्गारपरायणाः क्षितिभुजो मौलौ करिष्यन्ति नः ॥ १६१ ॥

§ ६. विनैः कतिपयैर्गौडदेशान्तर्विहरन् गुरुः। श्रीलक्षणावतीपुर्याः प्रापारामावनीतलम् ॥ १६२ ॥
तत्र वाक्पतिराजोऽस्ति श्रीधर्मक्ष्मापपर्षदि। विदुषां मौलिमाणिक्यं प्रबन्धकविरद्भुतः[6] ॥ १६३ ॥ 20
प्रभोरागमनं ज्ञात्वा जलदस्येव चन्द्रकी[7]। तदागमनगीर्भिः स भूपालं पर्यतोषयत् ॥ १६४ ॥
यशो वाग्देवता यस्य कविर्मे प्राच्यसंस्तुतः। स इहागात् प्रभोः पुण्यैर्बप्पभट्टिर्मुनीश्वरः ॥ १६५ ॥
ज्योत्स्नाप्रिय इवैणाङ्कोदयादेष विशांपतिः। अजल्पदुद्धुपद्रोमा विद्वन्मण्डलमण्डनम् ॥ १६६ ॥
विश्वकोविदकोटीरमेष जैनमुनीश्वरः। ध्रुवं यत्र[8] समभ्येति कृतपुण्यः स वासरः ॥ १६७ ॥–युग्मम्।
परं मेऽस्त्यामराजेन दुर्ग्रहो विग्रहाग्रहः। तदाह्वानाद् यदा पश्चाद् याति तन्मे तिरस्कृतिः ॥ १६८ ॥ 25
प्रष्टव्यस्तन्मुनिस्वामी स चेदागत्य मां नृपः। साक्षादापृच्छते[9] प्रस्थातव्यं तन्नान्यथा त्वया ॥ १६९ ॥
सुधीभिः कथितेऽर्थेऽस्मिन् सूरिणांगीकृते सति। तज्ज्ञात्वा धर्मभूपालः परमानन्दमाप्तवान् ॥ १७० ॥
आमराजप्रवेशाच्च सहस्रगुणितं ततः। प्रवेशोत्सवमाधत्त पुर्यामाचार्यभूपतेः ॥ १७१ ॥
धर्मभूपे तदा साक्षादिव धर्मे पुरःस्थिते। चक्रवर्ती सुधीवृन्दे प्रोचे वृत्तमिदं तदा ॥ १७२ ॥

तद् यथा*– 30
रुचिरचरणारक्ताः सक्ताः सदैव हि सद्गतौ
परमकवयः काम्याः सौम्या वयं धवलच्छदाः।

---

1 A विउद्धेण; B विउद्देण। 2 A B संचरंती। 3 A °स्वांग। 4 N चंकमती पए कीस°। 5 A नहपंती। 6 N कवि-स्सरः। 7 N चन्द्रिका। 8 A यत्रः। 9 N °दापृच्छयते। * केवलं A आदर्शे लभ्यते पदमिदम्।

गुणपरिचयोद्धर्षाः सम्यग्गुणातिशयस्पृशः
क्षितिप ! भवतोऽभ्यर्णं तूर्णं सुमानससंश्रिताः[1] ॥ १७३ ॥

तत्रापि काव्यवक्तृत्वलीलानन्दितपार्षदाः[2] । अवतस्थे सुखं सूरिर्दोगुन्दग इवामरः ॥ १७४ ॥
§७. तत्रश्चामनृपः प्रातरनायाते प्रभौ तदा । नगरान्तर्बहिर्ग्रामाकरादिष्वगवेषयत् ॥ १७५ ॥
5 अप्राप्तौ बालमित्रस्य पारवश्यं गतः शुचः । वैलक्ष्यमक्षतं भेजे च्यवनोन्मुखनाकिवत् ॥ १७६ ॥
अन्येद्युर्बहिरारामे गच्छन्नेकं ददर्श सः । बभ्रुं* बभ्रुं भुजङ्गेन हतं [3]चित्रीयितस्ततः ॥ १७७ ॥
अस्य मौलौ मणिं तत्रालुलोके सम्यगीक्षया । संस्तभ्य तुण्डमादत्त[4] फणीन्द्रमपमीर्नृपः ॥ १७८ ॥
तमाच्छायाथ संवृत्या संगृह्य निलये नृपः । आगत्य श्लोकशल्कं स जजल्प[5] विदुषां पुरः ॥ १७९ ॥

'शस्त्रं शास्त्रं कृषिर्विद्या अन्यो यो येन जीवति ।'

10 तैः पूरिता समस्येयमभिप्रायैर्निजैर्निजैः । विभेद हृदयं नैव तेषामेकोऽपि भूपतेः[6] ॥ १८० ॥
सस्मार भारतीपुत्रं बप्पभट्टिं तदा दृढम्[7] । मालतीकुसुमामोदमसौ रोलम्बबालवत् ॥ १८१ ॥
खद्योता इव चन्द्रस्य बालेया इव दन्तिनः । मम मित्रस्य विद्वांसः कलां नार्हन्ति षोडशीम् ॥ १८२ ॥
टंकलक्षं ददे हेम्नस्तस्य यः किल पूरयेत् । समस्यां मदभिप्रायात् प्रादात् पटहमीदृशम् ॥ १८३ ॥
अथो दुरोदराजीव एकः सर्वस्वनाशतः । श्रुत्वेति स धनोपायममुं श्लोकार्धमाददे ॥ १८४ ॥
15 ज्ञात्वा कुतोऽपि गौडेषु पुर्यां [8]तत्रागमच्च सः । बप्पभट्टिप्रभुं नत्वा कथयामास तत्पुरः ॥ १८५ ॥
अपराद्धं स चाह स्म क्लेशलेशं विना यतः । सरस्वतीप्रसादो हि विश्वक्लेशाब्धिकुम्भभूः ॥ १८६ ॥

तच्च—

'सुगृहीतं हि कर्तव्यं कृष्णसर्पमुखं यथा' ॥ १८७ ॥

नागावलोक इत्याख्यां [9]राज्ञस्तत्र प्रभुर्ददौ । ततः प्रभृत्यनेनापि नाम्ना विख्यातिमाप सः ॥ १८८ ॥
20 स द्यूतकृत् तदादायागमद् आमनृपाग्रतः । मुदा निवेदयामास तच्चमत्कारकारणम् ॥ १८९ ॥
केनापूरीति राज्ञा च पृष्टः प्रोवाच स प्रभो ! । श्रीबप्पभट्टिनेत्युक्ते ददौ तस्योचितं नृपः ॥ १९० ॥
विरहस्य विनोदायान्येद्युर्भूपो बहिर्ययौ । मृतं न्यग्रोधवृक्षस्य तले पान्थं ददर्श च[10] ॥ १९१ ॥
शाखायां लम्बमानां च तथा करकपत्रिकाम् । श्च्योतन्तीं विप्रुषां व्यूहं गाथार्धं लिखितं तथा ॥ १९२ ॥

तच्च—

25 'तइया मह निग्गमणे पियाइ थोरंसुएहिं जं रुन्नं ।'

प्राग्वत् तदपि नापूरि भूपालस्य मनोहरा[11] । केनापि विदुषा कोऽर्कं विना विश्वप्रकाशकः ॥ १९३ ॥
अस्यामलक्ष्यलक्ष्यायां समस्यायां स देवनी‡ । पुनर्ययौ च श्रीबप्पभट्टिपार्श्वेऽवदच्च ताम् ॥ १९४ ॥
स चानायासतो विद्वन्मौलिः प्रभुरपूरयत् । गृहीत्वा स पुनः प्रायादुत्तरार्धं नृपाग्रतः ॥ १९५ ॥

तच्च—

30 'करवत्तियविंदुनिवडणमिहेण तं अज्ज संभरिअं' ॥ १९६ ॥

अन्येन विदुषा केनचिद्ध्वन्येन तत्र तत् । सर्वं दृष्ट्वा दोधकार्धमभण्यत[12] यथामति ॥ १९७ ॥

---

1 N °संमिताः । 2 C N °पर्षदः; C °पार्षदं । * 'पिंगं नकुलं' इति C टिप्पणी । 3 A चिचित्रीयित° । 4 N °माचत्त । 5 N श्लोकशकलं जजल्प । 6 N भूपतिः । 7 N तदाहतम् । 8 N पुर्यंत आगमच्च । 9 N राज्ञे । 10 N सः । † 'स्थूराश्रुभिः' इति C टिप्पणी । 11 A B मनोहराम्; N मनोहरम् । ‡ 'द्यूतकृत्' इति C टिप्पणी । 12 N °मभाष्यत ।

तथा हि–

करवत्तयजलबिंदुआ[1] पंथिय हियइ निरुद्ध ।–पथिकोक्तिः ।
सा रोअंती संभरी नयरि ज मुंकी मुद्ध ॥ १९८ ॥–श्रीबप्पभट्टेरुक्तिः ।

इति पाठान्तरम् ।

राजा श्रुत्वेति दध्यौ च रसपुष्टिममूदृशीम् । मम मित्रं मुनिस्वामी कविर्भ्राति नापरः ॥ १९९ ॥ 5
प्रधानान् भूपतिः प्रैषीदाह्वानाय मुनीशितुः । तदुपालम्भगर्भाणि दोधकं वृत्तमार्यया ॥ २०० ॥
तेऽप्योपान्तं प्रभोराप्याप्राप्य विगतचेतनैः । वाचिकं कथयामासे कुशलप्रश्नपूर्वकम् ॥ २०१ ॥

तद्यथा–

छायह कारणि सिरि धरिअ पचि वि भूमि पडंति ।
पत्तहं इहु पत्तत्तणु वरतरु कांइं करंति ॥ २०२ ॥ 10
न गङ्गां गाङ्गेयं सुयुवतिकपोलस्थलगतं
न वा शुक्तिं मुक्तामणिरुरसिजास्वादरसिकः ।
न कोटीरारूढं स्मरति च सवित्रीं वसु भुवं
ततो मन्ये विश्वं स्वसुखनिरतं स्नेहविरतम् ॥ २०३ ॥
पांशुमलिनांघ्रिजंघः कार्पटिको म्लानमौलिमुखशोभः । 15
यद्यपि गुणरत्ननिधिस्तथापि पथिकः पथि वराकः ॥ २०४ ॥

इत्याकर्ण्य गुरुस्तेषां पुरः प्राह वचः स्थिरम् । सौहृदे दौर्हृदे वापि संसृजेन्मनसा मनः ॥ २०५ ॥
आमनाममहीभर्तुर्भवद्भिर्वाचिकं हि नः । निवेदनीयमार्यस्य दृढं गाथाकदम्बकम् ॥ २०६ ॥

तथा हि–

गय माणसु चंदणु[3] भमरु रयणायरु सिरि(ससि?)खंडु । 20
जड उच्छु य[4] बप्पभट्टि किउ सत्तय[5]गाहासंडु ॥ २०७ ॥
विंझेण विणा वि गया नरिंदभुवणेसु हुंति गारविया ।
विंझो न होइ अगओ गएहिं बहुएहिं वि गएहिं ॥ २०८ ॥
माणसरहिएहिं [6]सुहाइं जह न [7]लब्भंति रायहंसेहिं ।
तह तस्स वि तेहि[8] विणा तीरुच्छंगा न सोहंति ॥ २०९ ॥ 25
परिसेसियहंसउलं वि माणसं माणसं न संदेहो ।
अन्नत्थ वि जत्थ गया हंसा वि बया न भवंति ॥ २१० ॥
हंसा जहिं गय तहिं जि गय महिमंडणा हवंति ।
छेहउ ताहं महासरह जे हंसिहि मुच्चंति ॥ २११ ॥
मलओ सचंदणो च्चिय [9]नइमुहहीरंतचंदणदुमोहो । 30
पब्भट्ठं पि हु[10] मलयाओ चंदणं जायइ[11] महग्घं ॥ २१२ ॥
अग्घायन्ति महुयरा विमुक्ककमलायरा वि मयरंदं ।
कमलायरो वि[12] दिट्ठो भुओ व किं महुअरविहीणो ॥ २१३ ॥

---

1 A करवत्तजलबिंदुआं । 2 C गमिचय । 3 A चंदण । 4 A उच्छुय; C उच्छुय । 5 A B सत्तह । 6 A माणसरहिं ।
7 A न लब्भंति; C नब्भंति । 8 A तेण । 9 A नयमुह° । 10 A ह । 11 A जाइ । 12 A पि ।

